**मोटार वाहन निरीक्षक पदावर**
**पदोन्नती व पदस्थापना .**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एमव्हीडी ०११५/प्र.क्र.४५ /परि-३**
गृह विभाग, दुसरा मजला,मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१ ऑगस्ट, २०१५

**संदर्भ :-** १) शासन निर्णय क्रमांक- एमव्हीडी ०११४/प्र.क्र.५३/परि-३ दिनांक १२.०१.२०१५.
२) शासन निर्णय क्रमांक एमव्हीडी-०९१३/प्र.क्र.३१९/परि-४ दिनांक १७.०६.२०१५.

**प्रस्तावना :-** संदर्भिय शासन निर्णयान्वये सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक या संवर्गातील एकूण ६८ उमेदवारांना मोटार वाहन निरीक्षक या पदावर तात्पुरत्या व तदर्थ स्वरूपात पदोन्नती देण्यात आलेली आहे. या उमेदवारांबरोबर सदर निवडसूचीतील अ.क्र. १५ वरील उमेदवार श्री.सुहास श्रीराम सुत्रावे यांना विभागीय पदोन्नती समितीने पात्र ठरविले होते. तथापि त्यांचेविरूद्ध म.ना.से. (शिस्त व अपिल) नियम, १९७९ च्या नियम ८ खाली विभागीय चौकशी प्रस्तावित असल्याने त्यांचे प्रकरणी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २२.०४.१९९६ च्या शासन निर्णयानुसार पदोन्नती द्यावयाची काय, ह्याबाबत जाणिवपूर्वक निर्णय घेणे आवश्यक असल्याने त्यांचे निवडसूचितील इतर उमेदवारांबरोबर पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात आले नाही. श्री.सुहास सुत्रावे यांना विभागीय चौकशीच्या अधिन राहून पदोन्नती देण्याचा शासनाने जाणिवपूर्वक निर्णय घेतला. दरम्यानच्या कालावधीत श्री. सुहास सुत्रावे यांचेविरूद्ध असलेली विभागीय चौकशी संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये बंद करण्यात आलेली असल्याने श्री.सुहास सुत्रावे यांना मोटार वाहन निरीक्षक या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मोटार वाहन विभागातील श्री. सुहास सुत्रावे, सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक यांना विभागीय पदोन्नती समितीने मान्य केलेल्या निवडसूचीनुसार " मोटार वाहन निरीक्षक " या पदावर रु ९३००-३४८०० (ग्रेड पे रु.४५००) या सुधारीत वेतन संरचनेत तात्पुरत्या व तदर्थ स्वरूपात खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

१) सदर अधिकाऱ्यांची पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची राहील व वरिष्ठ संवर्गात जेष्ठतेकरीता ग्राह्य धरता येणार नाही. त्या संवर्गात वेतनाव्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ मिळणार नाहीत.

२) सदर पदोन्नती केवळ ११ महिन्याकरीता देण्यात येत असून त्यानंतर सदर पदोन्नती चालू ठेवावयाची असल्यास ११ महिन्यांच्या कालावधीनंतर त्या-त्यावेळी खंड देण्यात येईल.

| अ.क्र. | सहाय्यक मोटार वाहन निरीक्षकाचे नाव | जात प्रवर्ग | वाटप झालेला महसुली विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. सुत्रावे सुहास श्रीराम | खुला | औरंगाबाद | औरंगाबाद |

२. उपरोक्त पदोन्नती ही तदर्थ धर्तीवर व मा. उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक ८४५२/२००४ या याचिकेच्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे. त्यामुळे सदर रिट याचिकेत अंतिमत: दिल्या जाणाऱ्या आदेशामुळे हे पदोन्नतीचे आदेश बाधित होणार असल्यास या आदेशांच्या अनुषंगाने पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना सेवाज्येष्ठता किंवा आर्थिक फायद्यांसदर्भात मागणी करण्याचा हक्क राहणार नाही.

३. सदर पदोन्नतीनंतरची पदस्थापना सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि.२८.०४.२०१५ व दि. १६.०७.२०१५ मधील संवर्ग वाटपाच्या तरतुदीनुसार करण्यात आली आहे.

४. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी (प्रादेशिक/उप प्रादेशिक परिवहन अधिकाऱ्यांनी) वरील अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच पदोन्नती वरील अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदाचा कार्यभार कार्यालय प्रमुखांचे सल्ल्याने अन्य अधिकाऱ्याकडे सोपवून, तात्काळ कार्यमूक्त व्हावे व पदोन्नतीच्या ठिकाणी तात्काळ कार्यभार स्विकारावा.

५. सदर आदेश प्राप्त होताच वरील अधिकाऱ्यानी पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व रुजू झाल्याचा दिनांक परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई यांना कळवावा. जे अधिकारी सदर आदेश प्राप्त होऊनही पदस्थापनेच्या पदावर रुजू होणार नाहीत, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२८१६३२१९३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Machhindranath R Shelke

Digitally signed by Machhindranath R Shelke
DN: CN = Machhindranath R Shelke, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.08.31 16:21:41 +05'30'

(म.रं. शेळके)
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. संबंधित मोटार वाहन निरीक्षक (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत)
४. प्रादेशिक परिवहन अधिकारी, औरंगाबाद
५. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, बीड
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
९. निवडनस्ती/परि-३.